ॐ श्रीगणेशाय नमः । देवेश विचारिती भ्रूशुण्डीप्रत । ह्या तीर्थोत्तमांत जे सिद्धि लाभले जगांत । त्यांचें सांगा सुखद चरित । आम्हांसी येथ संक्षेपें ।।१।। भ्रूशुण्डी तेव्हां देवांस म्हणत । मयूरेशक्षेत्रीं जा तुम्हीं समस्त। माझ्या आज्ञेनुसार त्वरित । तेथ सिद्ध व्हाल सारे ।।२।। सर्व ज्ञान लाभून । सिद्धि सर्वही मिळून । स्कंदपुराणांत विस्तारें शोभन । माहात्म्य कथिलें असे सारें ।।३।। मीं संक्षेपानें कथिलें । क्षेत्रमाहात्म्य अवर्णनीय भलें । देवेशांनी पुनरपि प्रार्थिलें । नित्य यात्रा सांगा आम्हांसी ।।४।। क्षेत्र प्रदक्षिणेची माहिती । अन्य नरांची यात्रा कीर्ती । सर्व सिद्धिप्रद जी जगतीं । ती सांगा कृपा करोनी ।।५।। कोणी जन स्वभावें पापयुक्त ।

मयूरक्षेत्रीं निवास करित । नग्नभैरव त्यांस घालवित । नगराच्या बाहेरी ।।६।। परी संस्कारें समायुक्त । गाणपत्य तो कैसा होत । पुनरपि सन्मान लाभत । या क्षेत्रांत तो कैसा? ।।७।। भ्रूशुण्डी पूर्ववृत्तान्त तैं सांगत । बंगाल प्रांतीं विप्र वसत । गणपतिपरायण अत्यंत । विश्वामित्र कुळांतला ।।८।। त्याचें नांव शंभु असत । महायश तो पुण्यवंत । त्याच्या प्रवेशून हृदयांत । नग्नभैरव बुद्धिभेद करी ।।९।। त्या योगें तो द्विज व्यथित । म्हणे क्षणभंगुर हा देह वर्तत । केव्हां पाहीन मयूरेशा पुनीत । देहधारक मीं अहो ।।१०।। नंतर पत्नी पुत्रासह निघत । घर सोडून यात्रारत । भिक्षा मागून उदर भरित । द्रव्यहीन तो शंभु विप्र ।।११।। दोन महिने मार्ग चालून । पोहोचला जेव्हां तो ब्राह्मण । गणेशतीर्थांच्या तीरीं तैं महान । आनंद झाला हृदयांत ।।१२।। मयूरेशास प्रथम पूजित । तदनंतर यात्रा करी विधानयुक्त । क्षेत्रसंन्यासभावें भजत । द्विरदानना गणेशासी ।।१३।। अन्तीं स्वानंदलोकीं जात । गणनायका नित्य भजत । हृदयांत त्याच्या विराजत । प्रभु गणेश सर्वदा ।।१४।। आतां जे अन्य पापपर । क्षेत्रत्याग करिती ऐसे नर । त्यांचें विचित्र चरित्र । ऐका आतां देवेश हो ।।१५।। वसिष्ठ कुळींचा एक ब्राह्मण वसत । त्या पवित्र मयूरक्षेत्रांत । परी जन्मापासून तो असत । महापापी चौर्यरत ।।१६।। तो न करी कधी वेदाध्ययन । मदोन्मत्त यौवनीं होऊन । मद्यमांसादींचें सेवन । परस्त्रीसंगही प्रिय त्यासी ।।१७।। त्याचा बुद्धिभेद करित । नग्नभैरव तैं तो ब्राह्मण दुर्वृत्त । परस्त्रीस एका पकडून करीत । विदर्भ प्रांतांत प्रयाण ।।१८।। ऐशापरी आधिपत्य करित । नग्नभैरव मयूरक्षेत्रांत । दंडधारक जो सर्व श्रेष्ठ । सत्ता चाले तयाची ।।१९।। दुसरें एक आख्यान । पापी नराचें करितों कथन । मयूरक्षेत्रीं जाण्या इच्छून । जे न तेथे पोहोचले ।।२०।। द्राविडांत वैश्य जन वसत ।

महापापी जे विख्यात । विषादि देऊन ठार मारित । द्रव्यलोभें अन्य जनांसी ।।२१।। शंभु सोमक कुब्ज कंबळ । ऐसे चार मित्र प्रबळ । मद्यमांस रत अमंगळ । परस्त्री लालस सर्वही ते ।।२२।। शिश्नोदर परायण । पुण्य लेशही न मिळवून । स्वधर्मनियम सोडून । स्वच्छंदानें रहात होते ।।२३।। त्याच नगरांत होता वसत । श्यामल नाम वैश्य धनवंत । तो महापापी दैवयोगें मरत । शंकर नामिक मेव्हणा त्याचा ।।२४।। तो शंकर स्वधर्म निरत । पुण्यकर्मपरायण वर्तत । अस्थिसंचय श्यामलाचा करित । उद्धार त्याचा व्हावया ।।२५।। एक मास होता तो वैश्य जात । एकदा जैं तेव्हां भेटत । ते चार वैश्य धूर्त पापरत । तयासी म्हणे विनयानें ।।२६।। हया श्यामल वैश्याच्या अस्थि असत । तुमच्या स्वाधीन मीं करित । त्या न्याव्या मयूरक्षेत्रांत । दंडकारण्यीं जाणार तेव्हां ।।२७।। व्यापार करण्या तेथ निघालात । तरी माझें करा हें प्रार्थित । श्यामलाच्या अस्थि ब्रह्मसुखप्रद गणेशतीर्थात । करा तुम्हीं विसर्जित ।।२८।। तैसेंचि करूं ऐसें सांगून । देऊन तयासी आश्वासन । चार वैश्य ते करिती गमन । मयूरक्षेत्रीं जाण्यासी ।।२९।। तेथ नग्नभैरव विघ्न आणित । त्यांचें सर्वस्व चोर हरित । अस्थिसंचयही नष्ट होत । दुःखें परतले स्वगृहासी ।।३०।। किंचितद्रव्य शेष राहत । तें घेऊन ते परतत । मयूरेश यात्रा न करित । ठरवलेली पापी ते ।।३१।। बुद्धिभेद होऊन त्यांचा न जात । श्यामलाच्या अस्थि मयूरक्षेत्रांत । ऐसा भैरव महाबळवंत । गणेशाज्ञेचें पालन करी ।।३२।। तो रक्षितो क्षेत्र उत्तम। भैरवाचें हें चरित्र मनोरम । जो ऐकेल भावयुक्त परम । त्यास सर्व शुभ मयूरक्षेत्रीं ।।३३।। देवेश पुनरपि प्रार्थित । त्या भ्रूशुंडी योग्याप्रत। ऐसा जो महाभाग नग्नभैरव विख्यात । स्तोत्र त्याचें वर्णावें ।।३४।। त्या स्तोत्रें करितां स्तवन । तो न होईल क्रुद्ध दारुण । बुद्धिभेद आमुचा

न करून । क्षेत्रप्रवेश देईल आम्हां ।।३५।। भ्रूशुण्डी म्हणे ऐका एकचित्त । फलदायक हें अद्भुत । जै नग्नभैरव संतुष्ट होत । पाठ याचा भावें करितां ।।३६।। सर्वमायाविहीनासी । सर्वमायाप्रचालकासी । सर्वांतर्यामीसी नित्यासी । नग्नभैरवा तुला नमन ।।३७।। मयूरेशपरासी मयूरपुरपालकासी। धार्मिकांच्या संरक्षकासी । अधर्मनिरतां दंडकर्त्यासी । नग्नभैरवा नमन तुला ।।३८।। सदा स्वानंद निष्ठासी । पापीजनां दंडकर्त्यासी महाबळवंतासी । ब्रह्मादि प्रचालकासी । नग्नभैरवा नमन तुला ।।३९।। अमेयशक्तिसी भुक्तिमुक्तिप्रदात्यासी । गाणेशांचें पालनकर्त्यासी । प्रलयकाळांत शूळ उगारिसी । ऐशा नग्नभैरवा तुला नमन ।।४०।। त्या प्रलयकाळांत ब्रह्मांड । भिवविसी तूं उदंड । शूळप्रोत महांड । नग्नभैरवा नमन तुला ।।४१।। अट्टाहासें देवेंद्रांसी । तैसेंचि संत्रस्त करिसी असुरांसी । गणनाथापुढें नृत्य करिसी । नग्नभैरवा नमन तुला ।।४२।। तूं हें सर्व विश्व पसरविसी । आदिअंत मध्यगत तूंच अससी । मयूरसंस्थ आम्हां सर्वांसी । रक्षण करी दयाळा ।।४३।। आम्ही अनन्यभावें भजत । शूळधारका तुज नमित । अखिल कारण तूं शाश्वत । जगत्प्रवृत्ती तव भयानें ।।४४।। प्रत्येक प्राणिमात्रास करित । स्वव्यापारमग्न तूं जगांत । तुझ्या आधारें जग नांदत । परेशा रक्षी आम्हांसी ।।४५।। तुझी भक्ति आमुच्या मनांत । दृढ करी तूंच सतत । गणेशक्षेत्र तुझ्या स्वाधीन असत । निवास आम्हां तेथ देई ।।४६।। नग्नभैरवा तुज नमन । पुनः पुन्हा अभिवादन । नग्नभैरवाचें हें स्तोत्र महान । वाचितां ऐकतां शुभप्रद ।।४७।। धनधान्यादिक सर्व लाभत भुक्तिमुक्तिसमन्वित । या स्तोत्रानें जो स्तवित । नग्नभैरव देवासी ।।४८।। या स्तोत्राच्या वाचनें न घडत । मयूरक्षेत्राचा विरह जन्मांत । तयांसी दुर्लभ कांहीं न होत । जैसी श्रद्धा तैसें फळ ।।४९।। ओमिति

श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते नग्नभैरवप्रशंसा नामाष्टाविंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय अठ्ठाविसांवा संपूर्ण)